201504231526215927

(२९)

कुदे सुडकोली खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड नुतनीकरणाचे कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २०१०/(४५७/२०१०)/ खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- 23 /06/2011

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक ३८०६/कुदे सुडकोली /तां-२(१)/७४२४, दिनांक १९/१०/२०१०

प्रस्तावना :-

कुदे सुडकोली खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड ही योजना बृहत आराखडयात समाविष्ट असून केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाने सदर योजनेस दि.२२/०८/२००३ अन्वये अधिनियम १९९१ मधून किनारी नियमन क्षेत्रातून (CRZ) सूट दिली आहे. सदरची योजना बोर्डकालीन योजना आहे. समुद्राचे नियमित येणाऱ्या भरती ओहोटी व अतिवृष्टीमुळे बांधांची मोठया प्रमाणात धूप होऊन बांध कमकुवत झालेला असल्याने शेतकऱ्यांचे मोठे नुकसान होत आहे. सदर योजनेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ या वर्षाच्या व सार्वजनिक बांधकाम विभागाचे सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

कुदे सुडकोली खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड या योजनेस सन २००८-०९ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २००९-२०१० च्या दरसुचीवर आधारित, प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये २,५८,३६,५४५/- (रूपये दोन कोटी, अठ्ठावन लक्ष, छत्तीस हजार, पाचशे पंचेचाळीस फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये २,३४,८७,७६८/- व रूपये २३,४८,७७७/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार उपाय योजना(४) लहान बांधकामे (योजनांतर्गत) लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७...., मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००६/प्र.क्र.(८२/०६) विनियम दि.१३.३.२००७ मधील तरतूदीनुसार प्रशासकाय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (४२/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ज.प्र.जहागिरदार)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आतंर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोंद्रबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण, जि.रायगड
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(४५७/२०१०) खारभूमी दिनांक ९/०३/२०११ चे सहपत्र
कुदे सुडकोली खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ९३०११ |
| २ | "बी" (भूसंपादने) | ० |
| ३ | "सी" मुख्य कामे | १५८००६२० |
| ४ | "एफ" उघाडी काम | ७२१९८५७ |
| ५ | "के" इमारती | ० |
| ६ | "एम" वृक्षारोपन | २४१७९५ |
| ७ | "ओ" संकिर्ण | २५००० |
| ८ | "पी" देखभाल | ५७५५१ |
| ९ | "आर" दळणवळण | ४९९३४ |
| | कामाप्रित्यर्थ किमत | २३४८७७६८ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन किंमत वगळून १० टक्के) | २३४८७७७ |
| | एकूण | २५८३६५४५ |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | २०४.९४ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १२६०६९ < १३३००० मापदंडात बसते |
| लाभव्यय गुणोत्तर | २.७९ > १.०० मापदंडात बसते |
| दरसूची वर्ष | २००८-०९ व सा.बां.वि. २००९-१० |